महाराष्ट्र राज्यातील विविध सुरक्षा रक्षक मंडळातील कार्यरत सुरक्षा रक्षकांना त्यांच्या विशिष्ट सेवेसाठी प्रोत्साहनात्मक मानचिन्ह व प्रशस्तीपत्र देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,
शासन निर्णय क्र. एसजीए-२०२१/प्र.क्र.३४६/कामगार-५
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: २० एप्रिल, २०२२.

प्रस्तावना :-

महाराष्ट्र राज्यात सन १९८१ मध्ये महाराष्ट्र खाजगी सुरक्षा रक्षक (नोकरीचे नियमन व कल्याण) अधिनियम, १९८१ हा कायदा अंमलात आणण्यात आला असून सदर कायद्याअंतर्गत राज्यातील विविध सुरक्षा रक्षक मंडळातील सुरक्षा रक्षक यांची नियुक्ती व नोंदणी करुन त्यांना मागणीनुसार विविध मालक आस्थापनांमध्ये सेवेसाठी वितरीत करण्यात येते. त्यांना एखाद्या कंपनी आस्थापनेतील/कारखाना आस्थापनेतील इतर कामगारांप्रमाणे कामगार कायद्यानुसार विविध सामाजिक योजनांचा लाभ दिला जातो. सुरक्षा रक्षक हे पद व त्यांचे कर्तव्य अत्यंत संवेदनशील असून कर्तव्याच्या ठिकाणी काम करतेवेळी अशा रक्षकाकडून प्रामाणिकपणा, सचोटी व कर्तव्यपरायनता असणे आवश्यक आहे.

अहमदनगर येथे शासकीय जिल्हा रुग्णालयात दि.०६.११.२०२१ रोजी सकाळी १०.३० वाजता शॉर्टसर्कीट होऊन भीषण आग लागली. या ठिकाणी कार्यरत असलेल्या अहमदनगर सुरक्षा रक्षक मंडळातील ०५ सुरक्षा रक्षकांनी आपल्या जीवाची पर्वा न करता तेथील अतिदक्षता विभागात कोविड-१९ ने उपचार घेत असलेल्या बाधित रुग्णांना तेथून सुखरुप बाहेर काढण्यासाठी अथक प्रयत्न केले. तसेच तेथील आग विझविण्यासाठी आवश्यक ते सर्व प्रयत्न कसोशीने केले. सुरक्षा रक्षकांची ही कामगिरी कौतुकास्पद असून या सुरक्षा रक्षकांचा उचित सन्मान व्हावा तसेच अशा प्रकारच्या कामगिरीसाठी अन्य सुरक्षा रक्षकांना प्रोत्साहन मिळून त्यांचे मनोधैर्य उंचवावे, यासाठी या सुरक्षा रक्षकांचा उचित गौरव करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरुन कामगार आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात आली. सदर समितीने सुरक्षा रक्षकांच्या कामगिरीपरत्वे प्रोत्साहन पुरस्कारासाठीचे निकष ठरवून तसेच पुरस्काराचे सर्व तपशील ठरवून शासनास प्रस्ताव सादर केला. सदर प्रस्तावावर विचार करून शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

शासन निर्णय :-

राज्यातील महाराष्ट्र खाजगी सुरक्षा रक्षक (नोकरीचे नियमन व कल्याण) अधिनियम,१९८१ या कायद्याअंतर्गत विविध सुरक्षा रक्षक मंडळांतील नोंदीत सुरक्षा रक्षकांनी त्यांच्या सेवा कर्तव्यावर असताना दि. ०१ जानेवारी ते ३१ डिसेंबर या कालावधीत केलेल्या असामान्य कामगिरीची शासन स्तरावर नोंद घेवून त्यासाठी त्यांना गौरविण्यात येईल.

अ) **<u>असामान्य आणि विशिष्ट कामगिरीमध्ये खालील कामगिरींचा समावेश असेल</u> :-**

१) व्यक्तींचा जीव वाचविणे,

२) सर्व प्रकारचे गुन्हे वेळीच थांबविणेसाठी कसोशीने प्रयत्न करणे.

३) नैसर्गिक आपत्तीच्या वेळी मदतकार्य करणे.

४) अपघाताच्या (आग लागणे, वाहन अपघात, इतर कुठलेही जीवघेणे अपघात) वेळी जखमींना सर्वतोपरी मदत करणे,

५)आस्थापनेचे/जनतेचे कुठल्याही स्वरुपाचे संभाव्य/होणारे नुकसान टाळण्याकरीता कर्तव्यदक्षतेने काम करणे.

६) राज्य/राष्ट्रीय/आंतरराष्ट्रीय स्तरावरील खेळात प्रावीण्य दाखविणे.

**ब) <u>पुरस्कारासाठी राज्यस्तरीय निवड समिती गठीत करणे.</u>**

सुरक्षा रक्षकांची पुरस्कारासाठी निवड करण्याकरिता खालीलप्रमाणे समिती गठित करण्यात येत आहे. सदर समितीने घेतलेला निर्णय हा अंतिम असेल.

| अ.क्र | अधिकाऱ्याचे नाव | पदनाम |
|---|---|---|
| १. | मा. कामगार आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई | अध्यक्ष |
| २. | सह कामगार आयुक्त (माथाडी) | सचिव |
| ३. | सुरक्षा रक्षक मंडळ बृहन्मुंबई आणि ठाणे जिल्हा, मुंबई. | सदस्य |
| ४. | जिल्हा सुरक्षा रक्षक मंडळ,पुणे | सदस्य |
| ५. | महाराष्ट्र राज्य सुरक्षा महामंडळ यांचे प्रतिनिधी | निमंत्रित सदस्य |
| ६. | महाराष्ट्र माजी सैनिक राज्य महामंडळ मर्या. (मेस्को) यांचे प्रतिनिधी | निमंत्रित सदस्य |
| ७. | इतर दोन सुरक्षा मंडळाचे अध्यक्ष (चक्राकार पद्धतीने) | सदस्य |

**क) <u>पुरस्काराचे स्वरुप</u> :-**

१) सुरक्षा रक्षकाने केलेल्या कामगिरीकरिता सन्मानचिन्ह व सन्मानपत्र प्रदान करण्यात येईल.

**ड) <u>पुरस्कारांची संख्या</u> –**

प्रत्येक जिल्हयांकरिता जास्तीत जास्त ३ पुस्कार संबंधित वर्षाकरिता देण्यात येतील. तथापि, विशेष बाब असल्यास राज्य स्तरीय निवड समितीच्या मान्यतेने वाढीव पुरस्कारांची संख्या निश्चित करण्यात येईल.

**इ) <u>पुरस्कार निवड प्रक्रियेतील कालमर्यादा</u> :-**

१. महाराष्ट्रातील सर्व सुरक्षा रक्षक मंडळांचे असामान्य कामगिरी करण्याऱ्या सुरक्षा रक्षकांचा सन्मान करण्याबाबतचे प्रस्ताव उपरोक्त निवड समितीस दरवर्षी फेब्रुवारी अखेर पर्यंत सादर करणे.

२. निवड समितीने प्राप्त प्रस्तावांची छाननी **३१ मार्च पर्यंत** पूर्ण करणे.

३. मा.कामगार आयुक्त/ अध्यक्ष यांच्या संमतीने पुरस्काराची यादी **१५ एप्रिल पर्यंत** अंतिम करणे.

४. जिल्हा स्तरावरील, **१ मे** या महाराष्ट्र व कामगार दिन सोहळा समारंभात मा. पालक मंत्री/ विभागीय आयुक्त/ जिल्हाधिकारी यांच्या हस्ते सदर सन्मानचिन्ह, प्रशस्तीपत्र इ. चे वितरण निवड केलेल्या सुरक्षा रक्षकास करणे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक २०२२०४२०१७४९०९०५१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DR. SHRIKANT LAXAMANRAO PULKUNDWAR

Digitally signed by DR. SHRIKANT LAXAMANRAO PULKUNDWAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=INDUSTRIES, ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=feb24b5f5d1512bb47f7bae5ad1db4953358cd43c999bdf0814c6bb78364d50a, cn=DR. SHRIKANT LAXAMANRAO PULKUNDWAR
Date: 2022.04.20 17:50:21 +05'30'

**( डॉ. श्रीकांत ल. पुलकुंडवार )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत:-**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव (पत्राने)
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री सचिवालय,मंत्रालय,मुंबई
३. मा.मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई-४०० ०३२
४. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा, अ-६, मंत्रालय समोर,नरिमन पॉईट, मुंबई
५. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद, विधानभवन, मुंबई
६. मा.राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
७. प्रधान सचिव (कामगार), यांचे स्वीय सहायक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय,मुंबई
८. प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय यांचे स्वीय सहाय्यक, मुंबई
९. कामगार आयुक्त, कामगार भवन, बांद्रा कुर्ला कॉम्प्लेक्स, बांद्रा, मुंबई
१०. अध्यक्ष, सर्व सुरक्षा रक्षक मंडळे,
११. निवड नस्ती (कामगार-५).